महाराष्ट्र विनियोजन अधिनयम, २०२२
निधी वितरण............

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२२/२०२२-२३/प्र.क्र.२७/प्रशा-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ०६ एप्रिल, २०२२

**संदर्भ** :- वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं २०२२/ प्र क्र ४३/अर्थ-३ दिनांक ०४/०४/२०२२

## परिपत्रक

"महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२२" (महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२२) च्या अनुसूचीतील स्तंभ-४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांस विधानमंडळाने मंजुरी दिल्याचे व महाराष्ट्राचे मा. राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिल्याचे वित्त विभागाने त्यांच्या संदर्भाधिन परिपत्रकान्वये कळविले आहे. तसेच सन २०२२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३० म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग-४ दिनांक २८ मार्च, २०२२ मध्ये प्रसिध्द करण्यात आल्याचे वित्त विभागाने कळविले आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधिन शासन परिपत्रकान्वये वित्त विभागाने मंजुर केल्यानुसार अर्थसंकल्पीय अंदाज सन २०२२-२३ (White Book) पुस्तकाच्या आधारे प्रशासकीय विभागांना प्राधिकृत केलेल्या उद्दिष्टशीर्षांतर्गत निधी वितरीत करण्यात येईल.

३. वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक अर्थसं २०२०/प्र क्र ६५/अर्थ-३ दिनांक ०४ मे, २०२० व क्र. अर्थसं २०२१/प्र क्र ४८/अर्थ-३ दिनांक २४ जून,२०२१ अन्वये घालण्यात आलेले निधी वितरण व खर्चावरील निर्बंध रद्द करण्यात आले आहेत. वित्तीय वर्ष २०२२-२३ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीची मासिक निधी विवरणपत्रे, अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागाकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०२२-२३ च्या प्रथम नऊमाहीकरिता (डिसेंबर, २०२२ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य (Non Plan) व कार्यक्रमांतर्गत (Plan) खर्चाचा अर्थसंकल्पीय निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीद्वारे (बीम्स) वितरित करण्यात येईल. मासिक विवरणपत्रानुसार निधी एप्रिल ते डिसेंबर, २०२२ या कालावधीमध्ये मागे/पुढे ओढून घेण्याची सुविधा अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप व सनियंत्रण प्रणालीवर (बीम्स ) करण्यात आलेली आहे. निधी वितरित करताना मासिक निधी विवरणपत्रात (Cash Flow Statement ) ज्या दरमहा खर्च दर्शविण्यात आलेल्या आहेत त्याच्याशी सुसंगत असाव्यात, अशा वित्त विभागाने संदर्भाधिन शासन परिपत्रकान्वये सूचना दिलेल्या आहेत.

४. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अधिनस्त सर्व नियंत्रक व आहरण संवितरण अधिकारी यांनी वित्त विभागाच्या संदर्भाधिन परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या अटीच्या अधिन राहून अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापुर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्यनियमावली, वित्तिय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अर्थसं २०२२/प्र क्र ४३/अर्थ-३ दिनांक ०४ एप्रिल,

२०२२ परिच्छेद ४ ते १८ मधील मार्गदर्शक सूचना आणि परिशिष्टामधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०४०७१२२३४४७३१० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAGUNA GANESH THENGIL

Digitally signed by SAGUNA GANESH THENGIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d46fe3bd37ed57f0bdb52fb3a029adc135025943cb93cc90de6ceb564ced5ea3, pseudonym=E1C179DBCBC6C6E9A930E278944519A63E3712DA, serialNumber=8B4022592C04665617981351F8579C9ABD8539AE93768B3FF96B29E67B146A80, cn=SAGUNA GANESH THENGIL
Date: 2022.04.07 12:25:53 +05'30'

**( सगुणा काळे-ठेंगील )**
शासनाचे अवर सचिव

**प्रति,**

१) कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई
२) विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई
३) विकास आयुक्त (असंघटित कामगार), मुंबई
४) जिल्हाधिकारी, मुंबई शहर
५) प्रधान महालेखापाल, लेखापरीक्षा-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
६) प्रधान महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता -१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित, प्रकाशंगगा, बांद्रा पूर्व मुंबई-४०००५१
८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, बांद्रा पूर्व मुंबई-४०००५१
९) सर्व सह सचिव/ उप सचिव, उद्योग उर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई
१०) संचालक, शासकीय मुद्रण व लेखन सामुग्री संचालनालय, मुंबई
११) मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई
१२) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय,मुंबई
१३) संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई
१४) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय,मुंबई
१५) प्रबंधक, औद्योगिक न्यायालय, मुंबई
१६) संचालक, महाराष्ट्र श्रमविज्ञान संस्था, मुंबई
१७) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१८) निवड नस्ती प्रशासन-१,उद्योग,उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.